**स्वच्छ सर्वेक्षण-२०१८ मध्ये उच्चतम कामगिरी करणाऱ्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना प्रोत्साहनात्मक बक्षिसाची रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः स्वमअ-२०१७/प्र.क्र.२६४/नवि-३४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: १८ फेब्रुवारी, २०१९

<u>वाचा</u> : (१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. स्वमअ २०१५/प्र.क्र.२३/नवि-३४, दि. १५ मे, २०१५

(२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. स्वमअ २०१७/प्र.क्र.२६४/नवि-३४, दि. ३० डिसेंबर, २०१७

(३) शासन निर्णय, क्रमांकः स्वमअ-२०१७/प्र.क्र.२६४/नवि-३४, दिनांक: २२ ऑक्टोबर, २०१८

(४) शासन शुध्दिपत्रक क्रमांक: स्वमअ-२०१७/प्र.क्र.२६४/नवि-३४, दिनांक: २८ डिसेंबर, २०१८

**<u>प्रस्तावना:</u>**

केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत अभियानाच्या धर्तीवर राज्यामध्ये स्वच्छ महाराष्ट्र अभियानाची अंमलबजावणी सुरु आहे. या अभियानांतर्गत शहरांमधील ज्या कुटुंबाकडे शौचालयाची सुविधा नाही अशा कुटुंबियांना शौचालयाची सुविधा (वैयक्तीक अथवा सामुदायीक) उपलब्ध करुन देवून शहरे **"हागणदारी मुक्त"** करणे, तसेच शहरातील घनकचरा व्यवस्थापन करुन शहर **"स्वच्छ"** करणे या दोन प्रमुख बाबींचा समावेश आहे.

२. स्वच्छ महाराष्ट्र अभियानामध्ये सहभागी होण्यास लोकांना उद्युक्त करणे व हागणदारीमुक्त व स्वच्छता या बाबतीत शहरांची कायमस्वरूपी क्षमता वाढविणे आणि स्वच्छ महाराष्ट्राच्या दिशेने जो प्रवास चालला आहे. त्यामध्ये समाजातील सर्व घटकातील लोकांचा सांघिक सहभाग वाढविण्यासाठी जनजागृती निर्माण करण्याकरीता केंद्र शासन देशातील ४०४१ नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचे स्वच्छतेच्या अनुषंगाने स्वच्छ सर्वेक्षण-२०१८ जानेवारी , २०१८ ते मार्च, २०१८ या कालावधीत घेण्यात आले.

३. स्वच्छ सर्वेक्षण-२०१८ मध्ये राज्यातील सर्व शहरांची कामगारी उच्चतम होण्यासाठी शहरांना प्रोत्साहन मिळावे म्हणून संदर्भ क्रमांक-२ येथील शासन निर्णयान्वये बक्षीस योजना जाहीर करण्यात आली होती. स्वच्छ सर्वेक्षण-२०१८ मध्ये राज्याची कामगिरी सर्वोकृष्ट राहिली आहे. यामध्ये देशातील सर्वाधिक (४६ पैकी १०) पुरस्कार राज्यास प्राप्त झाले आहेत. केद्र शासनाने मे, २०१८ मध्ये स्वच्छ सर्वेक्षण - २०१८ स्पर्धेचा निकाल जाहिर केलेला आहे. त्यानुसार संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये बक्षिस पात्र शहरांच्या रूपये ३२५,००,००,०००/- पैकी रूपये १२०,८८,००,०००/- इतकी रक्कम वितरीत करण्यात आलेली आहे. उर्वरित रक्कमेपैकी रूपये १४,००,००,०००/- इतकी रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती

**<u>शासन निर्णय :</u>**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून स्वच्छ सर्वेक्षण - २०१८ स्पर्धेचा बक्षिस पात्र शहरांच्या वक्षिसाच्या रक्कमेपैकी **<u>रुपये १४,००,००,०००/- (चौदा कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.</u>**

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक एफ-२ "२२१७, नगर विकास, ८० सर्वसाधारण,१९२ नगरपरिषदांना सहाय्य (००) (४२) नगर परिषदांना वैशिष्टयपूर्ण कामांसाठी विशेष अनुदान (वेतनेतर), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

(२२१७ १३०१) " या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ च्या मंजूर अनुदानातून करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थस-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ मधील तसेच परिशिष्टातील अ.क्र. ८ मधील तपासणीसुचीतील अ.क्र. १ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

४. सदर निधी आहरित करण्यासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून तसेच सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी " घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रकमेचे देयक तयार करावे व ते अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्याकडे तात्काळ सादर करून सदर निधी आहरित करून धनादेश प्राप्त करून घेण्यात यावा. सदर निधी नागरी स्थानिक स्वराज्य संस्था निहाय वाटपाबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

५. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१८१७३४००४६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
Date: 2019.02.20 15:13:31 +05'30'

**(अजित पालवे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) आयुक्त, तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
६) सह सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मुंबई
७) सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
८) राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभिया न (नागरी) मुंबई
९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१०) अधिदान व लेखाधिकारी, फोर्ट, मुंबई.
११) अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई.
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३) निवडनस्ती, नवि-३४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.